**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी या योजनेकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-अविवि-२०२४/प्र.क्र.२५/का-९,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२ मार्च, २०२४.

**वाचा:-** (१) शासन ज्ञापन अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि २०२३/ प्र.क्र.१६/ का.९, दि.२४ ऑगस्ट, २०२३
(२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२ एप्रिल,२०२३.
(३) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि २०२३/प्र.क्र.१६/का.९, दि.३० ऑगस्ट, २०२३
(४) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि २०२४/प्र.क्र.९/का.९, दि.२८ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयामार्फत "राज्यातील अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, अल्पसंख्याकांशी निगडीत बाबी हाताळणारे प्रशासनातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण व राज्य शासनाने अल्पसंख्याकांसाठी घोषित केलेल्या योजनांना प्रसिद्धी" ही योजना राबविण्यात येते. या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उर्दू भाषेचे संवर्धन व प्रसिध्दी करीता अल्पसंख्याक विकास विभागामार्फत दि.२६ जानेवारी, २०२४ प्रजासत्ताक दिनानिमित्त उर्दू मुशायरा कार्याक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. सदर कार्यक्रमाचे देयक अदा करण्याकरीता तसेच विभागामार्फत राबविण्यात येणा-या विविध योजनाना वर्तमान पत्रात देण्यात येणा-या प्रसिध्दीचे देयके अदा करण्याकरीता या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी उपलब्ध तरतुदीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग "मागणी क्रमांक झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २००, व इतर कार्यक्रम (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी यासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ ए १८७) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) " या लेखाशीर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता रु.१२.०० कोटी (अक्षरी रूपये बारा कोटी फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. तथापि, वित्त विभागाने शासन परिपत्रक दि.१२ एप्रिल, २०२३ अन्वये, अर्थसंकल्पीत निधीपैकी माहे एप्रिल, २०२३ ते डिसेंबर, २०२३ अखेरपर्यत अंर्थसंकल्पित निधीच्या ७०% निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुसार सद्यस्थितीत वित्त विभागाने सदर योजनेच्या अर्थसंकल्पित निधीपैकी ४०% प्रमाणे रु.४,८०,००,०००/- कोटी (अक्षरी रूपये चार कोटी ऐंशी लक्ष फक्त) एवढा निधी बिम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करून दिलेला आहे. त्यापैकी संदर्भ क्र.३ च्या दि.३० ऑगस्ट,२०२३ च्या शासन निर्णयान्वये रु.२,०४,९१,०५०/- व शासन निर्णय दि.२८ फेब्रुवारी,२०२४ अन्वये रु.३४,३३,५००/- असे एकूण रु.२,३९,२४,५५०/- एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे. तर रु.२,४०,७५,४५०/- एवढा निधी शिल्लक आहे.

२. सदर शिल्लक निधीमधून मुशायरा कार्यक्रमाचे देयक अदा करण्याकरीता रु.१,६४,००,०००/-व वर्तमान पत्रातील जाहिरात देयकासाठी रु.२५,००,०००/- असे एकूण रु.१,८९,००,०००/- ची देयके अदा करण्याकरीता महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी वरील खर्चाकरीता मागणी क्र.झेड ई ०१, २२३५ ए १८७, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) , या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी **रू. १,८९,००,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी ऐकोनव्वद लक्ष फक्त)** इतके अनुदान महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास उपलब्ध करून देण्यात येत आहे. त्याचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**"मागणी क्र.झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी यासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ ए १८७) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)"**

| **अ.क्र.** | **तपशीलवार लेखाशिर्ष २२३५ ए १८७** | **सन २०२३ -२४ करीता अर्थसंकल्पीय अनुदान (रूपये)** | **सन २०२३-२४ मधील उपलब्ध अनुदान (अर्थसंकल्पीय तरतुदीच्या ४०%) (रुपये )** | **सन २०२३-२४ मधील मंजूर अनुदानातून उपलब्ध करून द्यावयाची रक्कम (रूपये )** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| | **२२३५ ए १८७** | **१२,००,००,०००/-** | **४,८०,००,०००/-** | **१,८९,००,०००/-** |
| | | | | **(अक्षरी रूपये एक कोटी ऐकोनव्वद लक्ष फक्त)** |

३. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी तर अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२३-२४ च्या मासिक निधी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेपर्यंतच करावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच संदर्भ क्र.२ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतुदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे. तसेच सदर वितरीत निधी बाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत केले जाणार नाही.

४. उपरोक्त रक्कम "मागणी क्रमांक झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिद्धी यासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ ए १८७) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२

एप्रिल, २०२३ मधील परिच्छेद व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अटींची पुर्तता होत असून त्यास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे".

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३२६१२३०५४६४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2024.03.26 12:41:24 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५) अवर सचिव, (व्यय ४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) कक्ष अधिकारी (का. ७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) निवडनस्ती (कार्यासन-९).